तुरची - तासगांव, जिल्हा - सांगली येथे नवीन
पोलीस प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यासाठी अनुदान
उपलब्ध करुन देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक - टिईएक्स-०३१०/प्र.क्र.३८०/पोल-५ अ
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १५ ऑक्टोबर, २०१०.

वाचा : १) शासन निर्णय, गृह विभाग क्र.-टिईएक्स-७३०६/प्र.क्र.६/पोल-५ अ, दि.२० सप्टेंबर, २००७
२) शासन निर्णय, गृह विभाग क्र.-टिईएक्स-०३०८/प्र.क्र.४४२/पोल-५ अ, दि.६ एप्रिल, २०१०
३) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांचे क्र.-प्रशि/आस्था-१/पोप्रवि धुळे/साधनसामुग्री/२०१०/२६०१, दि.१३ जून, २०१० चे पत्र
४) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांचे क्र.प्रशि/आस्था-१/पोप्रवि तासगाव/१०/४२८४, दि.२९ सप्टेंबर, २०१० चे पत्र

**शासन निर्णय :-**

तुरची - तासगांव, जिल्हा - सांगली येथे ५०० प्रशिक्षणार्थी इतकी क्षमता असलेले नवीन पोलीस प्रशिक्षण केंद्र सुरु करण्यास शासनाने संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये तत्वतः मंजुरी दिली होती. पोलीस दलाच्या आधुनिकीकरण योजनेतून व योजनांतर्गत योजनेतून तसेच पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाकडील उपलब्ध निधीतून सदर पोलीस प्रशिक्षण केंद्राच्या बांधकामासाठी अंदाजे एकूण रु.४६.४० कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र. २ च्या शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्र "अ" नुसार सदर प्रशिक्षण केंद्राच्या रु.२,३४,१३,०००/- इतक्या खर्चाच्या साधनसामुग्री / प्रशिक्षण साहित्याच्या खरेदीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. यासाठी अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई यांच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील दि.१३ जून, २०१० च्या पत्रान्वये सादर केलेला पुरवणी मागणीचा प्रस्ताव जुलै, २०१० च्या अधिवेशनात सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास विधानमंडळाने मान्यता दिली असून याबाबत महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१० (सन २०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्र. २०) महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि. २७ जुलै, २०१० मध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे. त्यानुसार कार्यालयीन खर्च आणि यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीसाठी एकूण रु.२,३४,१३,०००/- (रु. दोन कोटी चौतीस लाख तेरा हजार फक्त) इतकी तरतूद खालील अटींच्या अधीन राहून पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे.

१) पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी ज्या बाबीकरिता उपलब्ध झालेला आहे. त्याच बाबींवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

२) वित्त विभागाने मंजूर केलेल्या मासिक निधी विवरणपत्रानुसार सदरहू खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

२. या बाबीवरील खर्च "२०५५-पोलीस, (००) १०९ जिल्हा पोलीस, (००) (०१) जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८), १३ कार्यालयीन खर्च, ५२ यंत्रसामुग्री व साधसामुग्री" या लेखाशीर्षाखाली दर्शविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०४/१०/व्यय-७, दि.९ जुलै, २०१० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(म. रे. शेळके)
अवर सचिव, गृह विभाग

प्रति,

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई / नागपूर
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई
८) गृह विभाग (बियुडी-१), मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती (पोल-५ अ)